“मेक इन महाराष्ट्र” व “डिजीटल इंडिया” मिशन राबविण्याच्या अनुषंगाने कामगार विभागामार्फत राबविण्यात येणारे अधिनियम / नियम यामध्ये सुधारणा करणे व त्या अंतर्गतच्या प्रक्रीयांचे सुलभीकरण करणे, यासाठी समिती स्थापन करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ई-गर्व्हनन्स-२०१५/प्र.क्र.९/प्रशासन-२,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: ३० जानेवारी, २०१५.

**प्रस्तावना -**

देशांतर्गत होणारी आर्थिक गुंतवणूक वाढून, औद्योगिक विकासास चालना मिळावी तसेच देशाला निर्मिती, रचना व संशोधन यांचे क्षेत्र बनविणे यासाठी केंद्र शासनाने “मेक इन इंडिया” कार्यक्रम अंगिकारला असून त्या दृष्टीने विविध औद्योगिक / कामगार कायदे यांमध्ये अनुकुल बदल करणे व त्या अंतर्गतच्या प्रक्रीयांचे सुलभीकरण करणे इ. बाबी करण्याचे प्रस्तावित केले आहे.

“मेक इन इंडिया” कार्यक्रमाच्या अनुषंगाने राज्यात देखील “**मेक इन महाराष्ट्र**” व “**डिजीटल इंडिया**” मिशन राबविण्याचा निर्णय राज्य शासनाने घेतला आहे. या संदर्भात कामगार प्रभागामार्फत राबविण्यात येणारे अधिनियम (Act) व नियम (Rules) यामध्ये सुधारणा/बदल व सुलभीकरण करणे, यासाठी कामगार आयुक्त यांचे अध्यक्षतेखाली एक समिती स्थापन करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

## शासन निर्णय-

पुर्वोल्लेखित पार्श्वभूमीवर कामगार विभागामार्फत राबविण्यात येणारे अधिनियम / नियमात सुधारणा/बदल सुचविणे व त्या अंतर्गतच्या प्रक्रीयांचे सुलभीकरण करणे इ.साठी कामगार आयुक्त, महाराष्ट्र राज्य यांचे अध्यक्षतेखाली समिती स्थापन करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. सदर समितीची रचना पुढीलप्रमाणे राहील-

| अ.क्र. | समितीमधील सभासद | समितीमधील पद |
|---|---|---|
| १. | कामगार आयुक्त | अध्यक्ष. |
| २. | विकास आयुक्त (उद्योग) | सदस्य. |
| ३. | सह सचिव (कामगार) | सदस्य. |
| ४. | सह सचिव, विधी व न्याय विभाग (प्रधान सचिव, विधी व न्याय यांनी नामनिर्देशित केलेले) | सदस्य |
| ५. | श्री.अ.रा.लाकसवार, उप आयुक्त (कामगार),नागपूर | सदस्य. |

| अ.क्र. | समितीमधील सभासद | समितीमधील पद |
|---|---|---|
| ६. | उप आयुक्त (प्रशासन), कामगार आयुक्त कार्यालय | सदस्य सचिव |

सदर समितीने, कामगार विभागामार्फत राबविण्यात येणारे, खाली नमुद करण्यात आलेले अधिनियम / नियम व त्या अंतर्गतच्या प्रक्रीयांचा अभ्यास करुन त्यांमध्ये सुधारणा/बदल सुचविणे अशी समितीची कार्यकक्षा राहील.

१. कारखाने बांधकाम आराखडा मंजुरी,
२. कारखाने अधिनियम-१९४८ व त्या अंतर्गत नोंदणीकरण व परवाने,
३. मुंबई धुम्र उपद्रव अधिनियम -१९१२,
४. महाराष्ट्र बाष्पके नियम-१९६२,
५. महाराष्ट्र मितोपयोजक नियम-१९६५,
६. मुंबई दुकाने व आस्थापना अधिनियम १९४८ व त्या अंतर्गत नोंदणी,
७. कंत्राटी कामगार कायदा -१९७० (नियमन व निर्मूलन) व त्या अंतर्गत नोंदणी व परवाने,
८. किमान वेतन कायदा-१९३६ व त्या अंतर्गत नियोक्ता नोदणीकरण,
९. इमारती व इतर बांधकाम कामगार अधिनियम-१९९६ (सुरक्षा व कल्याण) व त्या अंतर्गत नोंदणी,
१०. आंतरराज्य स्थलांतरित कामगार (सेवायोजन नियम) सेवेच्या शर्ती अधिनियम-१९७९ व आंतरराज्य स्थलांतरित कामगार नियम-१९८० व त्या अंतर्गत नोंदणी,
११. उपदान प्रदान अधिनियम-१९७२ व त्या अंतर्गत नोंदणी,
१२. कामगार कल्याण निधी कायदा-१९५३,
१३. महाराष्ट्र कामगार संघटना मान्यता आणि कामगार अनुचित प्रथा प्रतिबंधक अधिनियम-१९७१,
१४. औद्योगिक विवाद अधिनियम-१९४७ व त्या अंतर्गत येणाऱ्या बाबी,
१५. मुंबई औद्योगिक संबंध अधिनियम-१९४६ व त्या अंतर्गत नोंदणी,
१६. महाराष्ट्र माथाडी हमाल व इतर श्रमजीवी कामगार (नोकरीचे नियमन व कल्याण) अधिनियम-१९६९ व त्या अंतर्गत नोंदणी,
१७. महाराष्ट्र खाजगी सुरक्षा रक्षक (नोकरीचे नियमन व कल्याण)-१९८१,
१८. महाराष्ट्र किमान घरभाडे भत्ता अधिनियम-१९८३,
१९. बाल कामगार अधिनियम १९८६,
२०. असंघटीत कामगार / घरेलू कामगार नियम.

महाराष्ट्र पोलीस अधिनियम व महाराष्ट्र खाजगी सुरक्षा रक्षक (नोकरीचे नियमन व कल्याण)-१९८१ यांचे सुटसुटीत एकत्रिकरण करण्याबाबत मा.मुख्यमंत्री महोदयांनी दिनांक १५.१.२०१५ च्या बैठकीमध्ये सुचित केले आहे. समितीने त्याबाबतच्या शिफारशीसह अहवाल, समिती स्थापन झाल्याच्या दिनांकापासून १ महिन्यात शासनास सादर करावा. तसेच कारखान्यांची प्रचलित पध्दतीने स्वेच्छाधिन तपासणी करण्याऐवजी ऑनलाईन पध्दतीने तपासणी करण्यासाठी मध्यवर्ती नियंत्रण ठेवणारी आज्ञावली विकसीत करण्यातबाबत देखील शासनास शिफारस करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१३०१४४९४८७३१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digambar Sonusing Rajput

Digitally signed by Digambar Sonusing Rajput
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry Energy & Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Digambar Sonusing Rajput
Date: 2015.01.30 03:26:37 -08'00'

( दि. सो. राजपूत )
शासनाचे उप सचिव.

प्रत,
मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव,
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
मा.मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव,
मा.राज्यमंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई,
प्रधान सचिव (उद्योग),उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई,
अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,
कामगार आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
श्री.अ.रा.लाकसवार, उप आयुक्त (कामगार),नागपूर,
उप आयुक्त (प्रशासन), कामगार आयुक्त कार्यालय,
विकास आयुक्त (असंघटीत कामगार), कामगार भवन,भूखंड क्र.सी-२०, ब्लॉक-इ, बांद्रा-कुर्ला संकुल, सिटी पार्क जवळ, बांद्रा (पूर्व),मुंबई-५१,
संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, कामगार भवन, ५ वा मजला, ब्लॉक-ई, भूखंड क्र.सी-२०, बांद्रा-कुर्ला संकुल, बांद्रा (पूर्व), मुंबई-४०००५१,
संचालक, बाष्पके, महाराष्ट्र राज्य यांचे कार्यालय, कामगार भवन, सातवा मजला, भूखंड क्र.सी-२०, ब्लॉक-इ, बांद्रा-कुर्ला संकुल, बांद्रा (पूर्व), मुंबई-४०००५१,
प्रबंधक, औद्योगिक न्यायालय,प्रशासकीय इमारत, पहिला मजला, वांद्रे (पूर्व),मुंबई-५१.
संचालक, कै. नारायण मेघाजी लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, दादाभाई चमारबागवाला मार्ग, परेल, मुंबई- १२.
कल्याण आयुक्त, महाराष्ट्र कामगार कल्याण मंडळ, हुतात्मा बाबु गेनू मुंबई गिरणी कामगार क्रिडा भवन, सेनापती बापट मार्ग, एलफिन्स्टन, मुंबई-४०००१३.
सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव (कामगार व प्रशासन) यांचे स्वीय सहायक,
निवडनस्ती (प्रशासन-२)